**सन १९८४ च्या दंगलीमध्ये मृत पावलेल्या व्यक्तींच्या वारसांना सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षाकरिता निवृत्तीवेतन अदा करण्यासाठी रक्कम वितरीत करणेबाबत......**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- सीएलएस-२०२२/प्र.क्र.२९/म-३,**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- १५ फेब्रुवारी, २०२२

वाचा:- महसूल व वन विभाग, शासन निर्णय, आरएलएफ-२०२१/प्र.क्र.२२/म-३, दि.१९.०१.२०२१

**प्रस्तावना :-**

१९८४ साली झालेल्या दंगलीतील बाधीत व्यक्तींना मदत देण्यासंदर्भात न्या.नानावटी यांच्या अध्यक्षतेखाली आयोग नेमण्यात आला होता. सदर आयोगाने केलेल्या शिफारशीची अंमलबजावणी करण्याच्या अनुषंगाने केंद्र शासनाने दि.१६ जानेवारी, २००६ रोजी "विशेष पॅकेज" जाहीर केले होते. या पॅकेजमधील मार्गदर्शक तत्वानुसार सदर दंगलीतील मृत व्यक्तींच्या वारसांना प्रत्येकी दरमहा रू.२,५००/- इतके निवृत्तीवेतन अनुज्ञेय करण्यात आले आहे.

२. केंद्र शासनाच्या वरील पॅकेजनुसार १९८४ च्या दंगलीतील मृत झालेल्या व्यक्तींच्या पात्र वारसांना सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता निवृत्तीवेतन अदा करण्यासाठी निधी उपलब्ध करून देण्याच्या अनुषंगाने पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

सन १९८४ च्या दंगलीत मृत झालेल्या पात्र वारसदारांना केंद्र शासनाच्या दि.१६ जानेवारी, २००६ च्या पॅकेजनुसार सोबत जोडलेल्या विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे प्रती व्यक्तीस दरमहा रू.२,५००/- (रूपये दोन हजार पाचशे फक्त) याप्रमाणे निवृत्तीवेतन अदा करण्यासाठी याव्दारे एकूण रू.९०.०० हजार (रुपये नव्वद हजार) एवढा निधी वितरीत करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे. या एकूण निधीपैकी विभागीय आयुक्त, नाशिक यांना रूपये ६०,०००/- (रूपये साठ हजार फक्त) व विभागीय आयुक्त, अमरावती यांना रूपये ३०,०००/- (रूपये तीस हजार फक्त) इतक्या रकमेचे वितरण करण्यात येत आहे.

३. यासाठी होणारा खर्च, "मागणी क्र.सी-५, मुख्य लेखाशीर्ष-२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण-६०, इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम-२००(०१)(०४) १९८४ च्या दंगलीतील मृत व्यक्तींच्या वारसांना निवृत्ती वेतन (२२३५-ए ३२९) (दत्तमत) या मुख्य लेखाशीर्षाखालील सन २०२१-२०२२ मधील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. विभागीय आयुक्त, नाशिक व विभागीय आयुक्त, अमरावती यांनी सोबत जोडलेल्या विवरणपत्रातील मृत व्यक्तींच्या वारसांना प्रत्येकी दरमहा रू.२,५००/- याप्रमाणे निवृत्तीवेतन देय असून, त्यानुसार माहे एप्रिल, २०२१ ते माहे मार्च, २०२२ या कालावधीतील निवृत्तीवेतन पात्र वारसदारांच्या हयातीची खात्री केल्यानंतर एक रक्कमी तात्काळ अदा करण्यात यावी.

५. आहरण व संवितरण अधिकारी यांनी कोषागार/उपकोषागार यांचेकडे पाठविण्यात येणाऱ्या बिलासोबत जोडल्या जाणाऱ्या संगणक चिठ्ठीमध्ये (Computer Slip) गौण / उपशिर्षाच्या गणकयंत्र संकेतांकाचा न चुकता उल्लेख करावा, असे आदेश नियंत्रण अधिकाऱ्यांनी द्यावेत.

६. कोणत्याही परिस्थितीत मंजूर अनुदानापेक्षा अधिक खर्च होणार नाही, याची दक्षता नियंत्रक अधिकारी यांनी घ्यावी. तसेच, खर्चाचा मेळ महालेखापाल यांनी नोंदविलेल्या खर्चाशी घेण्यात यावा व महालेखापालाच्या ताळमेळ प्रमाणपत्रासह विनियोजन लेखे शासनाकडे तात्काळ पाठवावे.

७. सदर प्रकरणी होणाऱ्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र आर्थिक वर्षाच्या अखेरपर्यंत न चुकता महालेखापाल यांना तसेच शासनास प्राप्त होईल, याची दक्षता विभागीय आयुक्त, नाशिक व विभागीय आयुक्त, अमरावती यांनी घ्यावी.

८. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०२१५१५४३०१२४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Sanjay Audumbar Dharurkar
Date: 2022.02.15 15:46:28 +05'30'

**( संजय औ. धारुरकर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त नाशिक/अमरावती
२) जिल्हाधिकारी, अहमदनगर/बुलढाणा
३) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
४) महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
५) संचालक लेखा व कोषागारे, संगणक शाखा, मुंबई,
६) जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर/बुलढाणा
७) वित्त विभाग (व्यय-९/अर्थसंकल्प-६), मंत्रालय, मुंबई
८) निवडनस्ती (म-३ कार्यासन).

# विवरणपत्र

शासन निर्णय क्र.सीएलएस-२०२२/प्र.क्र.२९/म-३, दिनांक १५ फेब्रुवारी, २०२२
सोबतचे विवरणपत्र

(१९८४ च्या दंगलीत मृत झालेल्या खालील ०३ व्यक्तींच्या वारसांना प्रत्येकी दरमहा रूपये २,५००/- याप्रमाणे सन २०२१-२०२२ करिता निवृत्तीवेतनाची रक्कम अदा करण्याबाबतचा तपशील)

| अ.क्र. | महसूल विभाग | जिल्हा | मृत व्यक्तीचे नाव | वारसदाराचे नाव व नाते |
|---|---|---|---|---|
| १ | नाशिक | अहमदनगर | पिरू ऊर्फ पिरन हसन सय्यद | श्रीमती सुग्रबी सय्यद (आई) |
| २ | नाशिक | अहमदनगर | सतपाल सिंग नंदपालसिंग | श्रीमती दर्शनकौर सतपालसिंग बाजवा (पत्नी) |
| ३ | अमरावती | बुलढाणा | दिनकर सिताराम डाबरे | श्रीमती सत्यभामाबाई दिनकर डाबरे (पत्नी) |

.................